विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती
(टप्पा-२) येथे उच्चस्तर वैद्यकीय अधिकारी
यांच्या १२ पदांची नव्याने निर्मिती करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय, क्रमांकः पदनि २०१५/प्र.क्र. २७२/आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १ सप्टेंबर, २०१७.

वाचा :

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पदनि २०१५/प्र.क्र. २७२/ आरोग्य ३, दिनांक- ०२.०१.२०१७**

प्रस्तावना :

राज्याच्या ग्रामिण भागातील सर्वसामान्य जनतेस ह्रदयविकार, कर्करोग, मुत्रपिंड विकार तसेच गंभीर अपघातांमुळे संभवणा-या विकलांगता टाळण्यासाठी आवश्यक अतिविशिष्ट तज्ञ चिकित्सा सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी महसूल विभागाच्या मुख्यालयी विभागीय संदर्भ सेवा रुग्णालये स्थापन करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या शासन निर्णयास अनुसरुन अमरावती या महसूल विभागांच्या मुख्यालयी विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय स्थापन करण्यात आले आहे. पहिल्या टप्प्यासाठी बांधकाम व पदनिर्मिती होऊन सदर विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय कार्यान्वित झाले आहे. तद्नंतर विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती येथे दुस-या टप्प्यामध्ये कार्डीओलॉजी, कार्डीयाक सर्जरी, ऑन्कोलॉजी, ऑन्कोसर्जरी, न्युरॉलॉजी व न्युरोसर्जरी इत्यादी अतिविशिष्ठ सेवा सुरु करण्यासाठी उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विविध संवर्गातील २७९ पदांच्या निर्मितीस मान्यता देण्यात आलेली आहे. यापदांशिवाय विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती (टप्पा-२) येथे

वैद्यकीय अधिकारी संवर्गातील उच्चस्तर वैद्यकीय अधिकारी, गट -अ च्या पदांची निर्मिती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती (टप्पा-२) येथे महाराष्ट्र वैद्यकीय सेवा, गट-अ मधील वैद्यकीय अधिकारी संवर्गातील उच्चस्तर वैद्यकीय अधिकारी, गट-अ (वेतनश्रेणी- १५६००-३९१००, ग्रेड पे-७६००) या १२ पदांची निर्मिती करण्यास व त्यासाठी येणाऱ्य आवश्यक आवर्ती खर्चास मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | ग्रेड पे | एकूण पदे |
|---|---|---|---|---|
| १ | कर्करोग तज्ञ | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| २ | कर्करोग शस्त्रक्रिया तज्ञ | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| ३ | कर्करोग विकार विभाग बधिरीकरण तज्ञ | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| ४ | किरणोपचार तज्ञ | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| ५ | क्ष-किरण शास्त्रज्ञ | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| ६ | मेंदु व मज्जारज्जू विकार तज्ञ | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| ७ | मेंदु व मज्जारज्जू शस्त्रक्रिया तज्ञ | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| ८ | मेंदु व मज्जारज्जू विकार विभाग बधिरीकरण तज्ञ | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| ९ | शरीरविकृती शास्त्रज्ञ | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| १० | हृदय विकार तज्ञ | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| ११ | हृदय विकार विभाग बधिरीकरण तज्ञ | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| १२ | हृदय विकार शस्त्रक्रिया तज्ञ | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| | **एकूण** | | | **१२** |

५. सदर प्रस्तावित खर्च सन २०१७-१८ यावर्षी “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा-विषम चिकित्सा, ११०-रुग्णालये व दवाखाने, ११०-७-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०६)(२१)-मुफसल विभागाच्या मुख्यालयाच्या ठिकाणी विशेष संदर्भ सेवा केंद्र स्थापन करणे (२२१० ४२५९)” या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१८५/१४७२, दिनांक १८.०२.२०१६, वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-५०८/विसु,दिनांक १८.०५.२०१६ व ५०८/आपुक,दि.२३.१२.२०१६ आणि राज्य मंत्रिमंडळाने दि.१८ जुलै, २०१७ रोजी झालेल्या बैठकीत घेतलेल्या निर्णयास अनुसरुन निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०११३१००१८११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.09.01 15:27:36 +05'30'

**( रो. दि. कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र १/ २, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ,अकोला.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, अकोला.

७. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.
८. वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती
९. वित्त विभाग (कार्यासन- व्यय १३), मंत्रालय, मुंबई.
१०. नियोजन विभाग (कार्यासन १४७२), मंत्रालय, मुंबई.
११. सार्वजनिक आरोग्य विभाग (कार्यासन- आरोग्य ३अ, आरोग्य ४, सेवा १,सेवा २,सेवा ३, सेवा ५, अर्थसंकल्प).
१२. निवडनस्ती (आरोग्य ३)